**अशासकीय तंत्र विद्‍यालयातील १२ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या निदेशकांना वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करण्याबाबत**

**(२५) ३५१२७ (०४-०१-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.अमरसिंह पंडित, श्री.सतिश चव्हाण, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत, ॲड.निरंजन डावखरे, श्री.बाळाराम पाटील, श्री.नरेंद्र पाटील, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर : तारांकित प्रश्न क्रमांक ३११८५ ला दिनांक २६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्‍योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नेरूळ (नवी मुंबई) येथील तेरणा अशासकीय तंत्र विद्‍यालयातील १२ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या निदेशक श्री.एस.राऊत यांचेसह राज्यातील अन्य निदेशकांनी वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करावी अशी मागणी सन २०१३ पासून शासनाकडे वेळीवेळी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निदेशकांना वरिष्ठ वेतनश्रेणीसाठी त्यांचा नियुक्ती दिनांक हा कालावधी ग्राह्य न धरता ते कार्यरत असलेल्या संस्थेस १०० टक्के अनुदान प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून कालावधी ग्राह्य धरण्यासंदर्भात जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, ठाणे व संबंधित संस्थेकडून स्वयंस्पष्ट अभिप्रायासह मागविण्यात आलेला प्रस्ताव शासनास प्राप्त झाला काय व केव्हा,

(३) असल्यास, राज्यातील व्यवसाय शिक्षण संचालनालयांतर्गत असणाऱ्या अशासकीय अनुदानातील संस्थातील निदेशक, सहाय्यक अधिव्याख्याता, शिक्षक-शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनी खाजगी विनाअनुदानित काळात केलेली सेवा वरिष्ठश्रेणी/निवडश्रेणी तसेच कालबध्द पदोन्नतीसाठी ग्राह्य धरण्याबाबतच्या विचाराधीन प्रस्तावावरील शासनाचा विचार पूर्ण झाला आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२६-०२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई यांचेकडे सदर प्रस्ताव प्राप्त झाला होता. तथापि, सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई यांनी स्वयंस्पष्ट अभिप्रायासह प्रस्ताव पुन्हा सादर करण्याबाबत जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, ठाणे व संबंधित संस्थेस कळविले आहे.
(३), (४) व (५) व्यवसाय शिक्षण संचालनायांतर्गत असणाऱ्या अशासकीय अनुदानित संस्थांतील निदेशक, सहा. अधिव्याख्याता, शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनी खाजगी विनाअनुदानित काळात केलेली सेवा वरिष्ठ/निवडश्रेणी तसेच कालबध्द पदोन्नतीसाठी ग्राहय धरण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या अद्यापि विचाराधीन आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने अधिक माहितीची आवश्कता असल्याने सदर माहिती व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाकडून संकलित करण्यात येत आहे.

---

## राज्यातील अनधिकृत बांधकामे प्रशमन आकार (शुल्क) लावून नियमित करण्याबाबत

**(२६) ३५३३४ (०४-०१-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार, डॉ.सुधीर तांबे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, आर्कि.अनंत गाडगीळ, प्रा.जोगेन्द्र कवाडे : दिनांक ९ ऑगस्ट, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ९ मधील प्रश्न क्रमांक २७५९४ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील मुंबई, पुणे व नागपूर यासारख्या मोठ्या शहरांमध्ये अनधिकृत बांधकामांची समस्या असून ही बांधकामे अधिकृत करण्यासाठी शासनाने दिनांक ३१ डिसेंबर, २०१५ पूर्वीची बांधकामे प्रशमन आकार (शुल्क) लावून आहे त्यास्थितीत नियमित करण्याबाबत प्रारूप नियम तयार केले असून ते दिनांक २१ जुलै, २०१७ रोजी एक महिन्याच्या कालावधीत हरकती व सूचना दाखल करण्यासाठी प्रसिध्द केले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील नगरपालिका क्षेत्रांतर्गत अनियमित बांधकामांना लागू असलेले शास्ती खूप अधिक असल्यामुळे गरीब नागरिकांवर मोठ्या प्रमाणात अन्याय होत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले असून ही शास्ती (दंड) कमी करावी अशी मागणी नगरपालिकांकडून वारंवार केली जात आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रश्न भाग (१) व (२) च्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२७-०२-२०१८) :** (१) होय, शासनाने राज्यातील नियोजन प्राधिकरणाच्या क्षेत्रात दिनांक ३१/१२/२०१५ पुर्वी झालेली अनधिकृत बांधकामे प्रशमन आकार लावुन प्रशमित संरचना म्हणून घोषित करण्याकरीता दिनांक २१/०७/२०१७ रोजी नागरीकांच्या सूचना/हरकतींसाठी प्रसिध्द केलेले नियम अंतिम करुन दिनांक ०७/१०/२०१७ रोजीच्या अधिसूचनेद्वारे प्रसिध्द केलेले आहेत.
(२) व (३) याबाबत काही नियोजन प्राधिकरणांकडून शासनास निवेदने प्राप्त आहेत. तथापि अनधिकृत बांधकामांना पायाभुत सोयी सुविधा पुरविणेसाठी संबंधित नियोजन प्राधिकरणांना निधीची आवश्यकता पडणार असून त्याकरीता सदर बांधकामे नियमित करतांना प्रशमनशुल्क आकारणेबाबत तरतूद केली असल्याने सदरची बाब योग्य आहे. उपरोक्त कार्यवाही होवून अनधिकृत बांधकामे नियमित झाल्यानंतर मालमत्ता कराच्या अनुषंगाने आकारण्यात येणारी शास्ती आपोआपच रद्द होणार आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**गृहपाल व अधिक्षक या पदासाठीचे निकष बदलण्यात आल्याबाबत**

**(२७) ३५५३० (०२-०१-२०१८). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात नोकर भरती बंद असताना गृहपाल व अधिक्षक या पदासाठीच्या निकषात बदल करण्यात आला असून सदर पदासाठी समाजकार्य पदवी अनिर्वाह नसल्याने समाजकार्य पदवीधारकांच्या बेरोजगारीत वाढ होणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गृहपाल व अधिक्षक या पदासाठी अर्ज केला आहे त्यांची समाजकार्य ही पदवी ग्राह धरण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त गृहपाल व अधिक्षक यांच्या पदासाठींच्या निकषात शासन बदल करणार आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१५-०२-२०१८)** : (१) हे खरे नाही,

गृहपाल व अधिक्षक या पदासाठीच्या निकषात बदल करण्यात आलेला नाही. समाजकार्य पदवी आवश्यक आहे.
(२) होय,
(३) सध्या ही बाब विचाराधीन नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शासकीय औद्यागिक प्रशिक्षण संस्थेमधील कनिष्ठ सर्वेक्षक तथा कनिष्ठ प्रशिक्षणार्थी सल्लागार यांच्या वेतन निश्चितीबाबत

**(२८) ३५६१४ (०४-०१-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील संचालक, व्यवसाय शिक्षण संचालनालय यांचेकडील दिनांक २२ डिसेंबर, २००४ रोजीच्या पत्रानुसार शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील कनिष्ठ सर्वेक्षक तथा कनिष्ठ प्रशिक्षणार्थी सल्लागार या पदावर कार्यरत असणारे अधिकारी दिनांक १ जानेवारी, १९८६ पासून २०००-३५०० या वेतनश्रेणीत, १ जानेवारी, १९९६ पासून ६५००-१०५०० या वेतनश्रेणीत व ६ व्या वेतन आयोगानुसार १५६००-३९१०० व ग्रेड पे ४५०० या वेतनश्रेणीत काम करीत आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ६ व्या वेतन आयोगानुसार कनिष्ठ सर्वेक्षक तथा कनिष्ठ प्रशिक्षणार्थी सल्लागार यांना पूर्णवेळ शिक्षकाप्रमाणे वेतनश्रेणी लागू करण्यासाठी शासनाकडे प्रस्ताव पाठविण्यात आलेला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रस्तावावर शासनाकडून कोणताही निर्णय झालेला नसल्याने अनेक सेवानिवृत्त अधिकाऱ्यांची व कार्यरत अधिकाऱ्यांची वेतन निश्चिती केली गेलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, याबाबत सदर कर्मचारी व लोकप्रतिनिधीकडून वारंवार मागणी केली जात असून याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१५-०२-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्या दिनांक २२ डिसेंबर, २००४ रोजीच्या पत्रानुसार कनिष्ठ सर्वेक्षक तथा कनिष्ठ प्रशिक्षणार्थी सल्लागार या पदास दिनांक ०१/०१/१९८६ पासून रुपये २०००-३५०० या वेतनश्रेणीचा लाभ अनुज्ञेय करण्यात आला आहे.

सदर पदास ५ व्या वेतन आयोगानुसार ५५००-९००० ही वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली होती. तथापि उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र.टिएसए-१००४/(३४९६)/व्यशि-४, दिनांक २९/०६/२००५ अन्वये दिनांक ०१/०१/१९९६ पासून सुधारीत वेतनश्रेणी रुपये ६५००-१०५०० (मूळ) व रुपये ७५००-१२००० (वरिष्ठ श्रेणी) मंजूर केलेली आहे.

सदर पदास ६ व्या वेतन आयोगानुसार दिनांक ०१/०१/२००६ पासून रुपये ९३००-३४८००, ग्रेड पे ४४०० ही वेतनश्रेणी लागू आहे.
(२) होय, हे खरे आहे.

उच्च व तंत्रशिक्षण आणि सेवायोजन विभाग शासन निर्णय क्र. पीटीएस-११९३/(२५८५)/व्यशि २, दिनांक ०३/०९/१९९३ अन्वये शासकीय/ अशासकीय संस्थांना जोडलेल्या उच्च माध्यमिक वर्गावरील तांत्रिक/ व्यावसायिक विषय शिकविणाऱ्या शिक्षकांना दिनांक ०१/०६/१९८२ पासून रुपये ६००-१०३० ही वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली आहे.

या शासन निर्णयात पदनामांचा स्पष्ट उल्लेख नसल्याने सदर वेतनश्रेणी कनिष्ठ सर्वेक्षक तथा कनिष्ठ प्रशिक्षणार्थी सल्लागार या पदास लागू करण्यात आली नाही. तद्नंतर व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या दिनांक २२ डिसेंबर, २००४ रोजीच्या पत्रानुसार कनिष्ठ

सर्वेक्षक तथा कनिष्ठ प्रशिक्षणार्थी सल्लागार या पदास दिनांक ०१/०१/१९८६ पासून रुपये २०००-३५०० या वेतनश्रेणीचा लाभ अनुज्ञेय करण्यात आला. तथापि सदर निर्णय संचालनालय स्तरावरून घेण्यात आला आहे. तद्नुषंगाने सदर सुधारित वेतनश्रेणी रुपये २०००-३५०० ही वेतनश्रेणी पूर्णवेळ शिक्षक/ अभियांत्रिकी अधिव्याख्याता/सहा. अभियांत्रिकी अधिक्षक/ कनिष्ठ सर्वेक्षक तथा कनिष्ठ प्रशिक्षणार्थी सल्लागार/गटनिदेशक इ. पदनामनिहाय लागू असल्याची धारणा पक्की करून शासन आदेश निर्गमित करण्याबाबतचा प्रस्ताव व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने शासनास सादर केलेला आहे.

(३), (४) व (५) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाकडून सादर करण्यात आलेला प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आलेला आहे. सदर प्रकरणी अद्याप अंतिम निर्णय झालेला नाही. संबंधित प्रकरणी वित्त विभागाच्या सल्ल्याने पुढील आवश्यक कार्यवाही करण्यात येत आहे. दरम्यानच्या कालावधीत संचालनालयाच्या दिनांक २४/०२/२०१४ च्या पत्रानुसार कनिष्ठ सर्वेक्षक तथा कनिष्ठ प्रशिक्षणार्थी सल्लागार या संवर्गातील वेतनश्रेणीमुळे ज्या अधिकाऱ्यांना निवृत्तीवेतन मिळत नाही, अशा अधिकाऱ्यांची वेतननिश्चिती निम्न वेतनश्रेणीत करून सुधारित वेतननिश्चिती करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत.

---

## बार्शी-कुर्डुवाडी (जि.सोलापूर) रस्त्याच्या दुरवस्था झाल्याबाबत

**(२९) ३५६२८ (०३-०१-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.विक्रम काळे, श्री.बाळाराम पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक २८६३० ला दिनांक १७ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बार्शी-कुर्डुवाडी-लातूर राष्ट्रीय महामार्ग क्र.१४५ बार्शी ते कुर्डुवाडी (जि.सोलापूर) या रस्त्यांची खड्डयामुळे दुरवस्था झाली असून सदर रस्त्यावर वारंवार अपघात होत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर रस्ता पश्चिम महाराष्ट्र व मराठवाडा या दोन मोठ्या विभागांना जोडत असल्यामुळे उक्त रस्त्यांची दुरूस्ती करण्याबाबत लोकप्रतिनिधी व नागरिकांनी शासनाकडे मागणी/आंदोलने केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर रस्त्याची दुरूस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२०-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही
(२) होय
(३) व (४) प्रश्नांकित रस्ता टेंभुर्णी-कुर्डुवाडी-बार्शी, येडशी-लातूर रा.मा.१४५ चा भाग आहे. हा रस्ता राष्ट्रीय महामार्ग क्र.५४८ सी म्हणून घोषित झाला आहे. या रस्त्याचे हस्तांतरण केंद्र शासनाकडे करुन रस्त्याची सुधारणा व दुरुस्ती देखभाल केंद्र शासनामार्फत होणे अपेक्षित आहे. या रस्त्यावरुन वाहतुक सुरळीत चालू आहे.

सद्य:स्थितीत रस्त्याच्या क्षतिग्रस्त लांबीपैकी २५ कि.मी. लांबीतील दुरुस्तीचे काम केंद्र शासनामार्फत व ९ कि.मी. लांबीतील काम राज्य शासनामार्फत करण्यात येत आहे. या दोन्ही कामांच्या निविदा बोलावण्यात आल्या असून निविदा निश्चिती करुन निधीच्या उपलब्धतेनुसार काम हाती घेऊन पूर्ण करण्याचे नियोजन आहे.

---

## राज्यात प्रमोद महाजन कौशल्य विकास योजना
## अधिक प्रभावीपणे राबविण्याबाबत

**(३०) ३५६८७ (०४-०१-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अकुशल कामगारांना कुशल बनवून त्यांना रोजगाराच्या संधी देण्यासाठी राज्य शासनाने कौशल्य विकास प्रशिक्षण योजनेची घोषणा केल्यानंतर राज्यात स्वतंत्र कौशल्य विकास मंत्रालयाची निर्मिती करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात प्रमोद महाजन कौशल्य विकास योजनेची घोषणा करत विद्यार्थी व महिलांना मोफत प्रशिक्षण व शासकीय प्रमाणपत्र मिळेल असे शासनाने गावोगावी प्रचार व प्रसार करून जाहिर केले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील कौशल्य विकास मंत्रालयाच्या निर्मितीनंतर राज्यात ७ हजार २५२ प्रशिक्षण संस्थांची नोंदणी होवून त्यांना मान्यताही देण्यात आलेली असताना निधी व नियोजनाच्या अभावी सदर संस्थांना टाळे लावण्याचा बिकट प्रसंग त्यांच्यावर ओढवला असून सुमारे ५६ हजारांहून अधिक कर्मचाऱ्यांवर बेरोजगारीचे संकट ओढावले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, राज्यात प्रमोद महाजन कौशल्य विकास योजना अधिक प्रभावीपणे राबविण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (०८-०२-२०१८) :** (१) होय. राज्यात सन १९९७ मध्ये रोजगार व स्वंयरोजगार या स्वतंत्र मंत्रालयीन विभागाची निर्मिती करण्यात आली असून त्यांचे दिनांक १५/०१/२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये कौशल्य विकास व उद्योजकता विभाग असे नामकरण करण्यात आले आहे.

(२) अंशत: खरे आहे.

(३) हे खरे नाही. महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीकडे माहे डिसेंबर, २०१७ अखेर एकूण २९११ प्रशिक्षण संस्था सुचिबध्द करण्यात आलेल्या आहेत.

(४) व (५) प्रश्न उद्‍भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्ह्यातील जलयुक्त शिवार योजनेंतर्गत कामे अपूर्ण असल्याबाबत

**(३१) ३५६८९ (०६-१२-२०१७). श्री.अमरसिंह पंडित : तारांकित प्रश्न क्रमांक ३०८९६ ला दिनांक २८ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्ह्यातील ४१३ गावांमध्ये जलयुक्त शिवार योजनेतील कामे मोठ्या प्रमाणावर अपूर्ण असून या कामात गैरव्यवहार झाल्याची तक्रार ग्राहक संरक्षण संस्था यांनी माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान शासनाकडे केली आहे, हे खरे आहे काय,

(२) तसेच मा.जलसंधारण मंत्री यांनी अपूर्ण कामांचा अहवाल सदर करण्याचे निर्देश दिले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१६-०२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३) यासंदर्भात जिल्हाधिकारी, यवतमाळ यांना शासनाचे पत्र दिनांक २३/०८/२०१७ अन्वये कार्यवाही करणेबाबत कळविण्यात आले आहे.

यवतमाळ जिल्ह्यात सन २०१५-१६ मध्ये जलयुक्त शिवार अभियानांतर्गत निवडलेल्या ४१३ गावातील एकूण २३३७७ कामांपैकी २३३५१ कामे पूर्ण करण्यात आली असून २६ कामे प्रगतीपथावर आहेत. सदर २६ कामे फेब्रुवारी, २०१८ अखेर पूर्ण करण्याचे नियोजन करण्यात आलेले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## गोंदिया जिल्हयात कुकुटपालनाच्या माध्यमातून अंड्यांचे उत्पादन वाढविण्याबाबत

**(३२) ३५७६३ (०३-०१-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गोंदिया जिल्हयात कुकुटपालनाकडे दुर्लक्ष झाल्यामुळे दरडोई १३९ अंड्यांचे उत्पादन कमी झाल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नॅशनल इन्स्टिट्युट ऑफ न्यूट्रीशनच्या शिफारशीनुसार दरडोई १८० अंड्यांची आवश्यकता असतानाही राज्यात ४१ अंड्यांचे उत्पादन होते हे उत्पादन दरडोईच्या तुलनेत फारच कमी असल्याने राज्य अंडी उत्पादनात पाचव्या क्रमांकावर गेले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कुकुटपालनाच्या माध्यमातून दरडोई अंड्यांचे उत्पादन वाढण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (२६-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) नॅशनल इन्स्टिट्युट ऑफ न्युट्रिशनच्या शिफारशीनुसार दरडोई १८० अंड्यांची आवश्यकता असतानाही राज्यात दरडोई अंड्यांची उपलब्धता ४७ एवढी असून राज्य अंडी उत्पादनात पाचव्या क्रमांकावर गेले आहे, हे खरे आहे.

(३) पशुसंवर्धन विभागामार्फत राज्यात अंडी उत्पादनात वाढ होण्यासाठी खालीलप्रमाणे विविध कुक्कुट पालनाच्या योजना राबविण्यात येत आहेत.

१) राज्यातील मध्यवर्ती अंडी उबवणी केंद्र, पुणे, कोल्हापूर, नागपूर व औरंगाबाद तसेच, १६ सघन कुक्कुट विकास गट यांचेमार्फत कुक्कुट पालकांच्या मागणीनुसार सुधारित जातीची एक दिवसीय पिल्ले, तलंगा, अंड्यावरील पक्षी व उबवणूकीची अंडी पुरविणे.

२) जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत एकात्मिक कुक्कुट विकास कार्यक्रमांतर्गत १०० एक दिवसीय पिल्ले तसेच, २५ मादी + ३ नर तलंगा अशा कुक्कुट गटाचे वाटप.

३) चालू आर्थिक वर्षापासून राज्यातील १६ जिल्ह्यामधील आदिवासी क्षेत्रात स्वयंम् प्रकल्पाची अंमलबजावणी.

४) राज्यातील १४ जिल्ह्यांमध्ये सार्वजनिक खाजगी भागीदारी तत्वावर सघन कुक्कुट विकास गट स्थापन करण्यात येत असून, त्यांचेमार्फत देखील सुधारित जातीची एक दिवसीय पिल्ले, तलंगा, अंड्यावरील पक्षी व उबवणूकीची अंडी पुरविण्यात येणार आहेत.

५) सन २०१८-१९ पासून टप्याटप्याने राज्यातील ३०२ तालुक्यात प्रति तालुका एक या प्रमाणे सार्वजनिक खाजगी भागीदारी तत्वावर सघन कुक्कुट विकास गट स्थापन करण्यात येणार आहेत.

६) केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत परसातील कुक्कुट पालनास चालना देण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मुंबई उपनगरातील चारकोप येथे चोरांनी धुमाकूळ घातल्याबाबत**

**(३३) ३५८०४ (०४-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई उपनगरातील चारकोप येथे माहे ऑगस्ट-सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान सेक्टर नं. ३ मध्ये चोरांनी धुमाकूळ घातला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या कालावधीत किती ठिकाणी चोऱ्या झाल्या व त्यामध्ये किती ऐवज लुटण्यात आले,

(३) असल्यास, या घटनांमध्ये आतापर्यंत किती जणांना अटक करण्यात आले आहे व त्यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०९-०२-२०१८) :** (१) व (२) माहे ऑगस्ट-सप्टेंबर, २०१७ मध्ये ३ चोरीच्या घटना घडलेल्या आहेत. त्यामध्ये एकूण रुपये ३,३२,५००/- चा ऐवज लुटण्यात आलेला आहे.

(३) उपरोक्त ३ चोरीच्या घटनांपैकी एका घटनेमध्ये २ आरोपींना अटक करण्यात आली असून मा.न्यायालयाने एका आरोपीतास शिक्षा सुनावली असून दुसऱ्या आरोपीतास दोषमुक्त केले आहे.

दुसऱ्या घटनेतील गुन्ह्याची अ वर्ग समरी करण्यासाठी मा.न्यायालयात सादर करण्यात आले असून तिसऱ्या गुन्ह्यातील आरोपीचा शोध घेण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबईतील ना-हरकत प्रमाणपत्र सादर न केलेल्या इमारतींवर कार्यवाही करणेबाबत

**(३४) ३६०५० (०४-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी मुंबईतील पाम बीच रोडवरील सत्रा प्लाझा या इमारतीचे भोगवटा प्रमाणपत्र (ओसी) रद्द करण्यात आल्याची बाब सन २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महापालिकेकडून सदरचा प्लॉट खरेदी करतेवेळी सत्रा प्लाझा यांनी वर्षभरात ना हरकत प्रमाणपत्र देणे बंधनकारक होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्लॉटवर इमारत उभारुन पूर्ण झाल्यावर सुध्दा सत्रा प्लाझा यांनी सिडकोकडून ना-हरकत प्रमाणपत्र मिळविलेले नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त इमारतीवर तसेच नवी मुंबईत ना-हरकत प्रमाणपत्र सादर न केलेल्या किती इमारतींवर अशा प्रकारची कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०२-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) व (३) नवी मुंबई महानगरपालिकेकडून भोगवटा प्रमाणपत्र मिळतेवेळी सत्रा प्लाझा यांनी सिडकोचे “ना-हरकत प्रमाणपत्र” सादर करणे बंधनकारक होते. परंतु सदर “ना-हरकत प्रमाणपत्र” सत्रा प्लाझा यांनी सादर केले नाही, ही वस्तुस्थिती आहे.

(४) उक्त इमारती व्यतिरिक्त इतर कोणत्याही इमारतीवर अशा प्रकारची कारवाई करण्यात आलेली नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील सर्व असंघटीत क्षेत्रातील घटकांकरिता कल्याणकारी मंडळाची स्थापना करण्याबाबत

**(३५) ३६०५३ (०४-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव : तारांकित प्रश्न क्रमांक ३४३१५ ला दिनांक ९ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व असंघटीत क्षेत्रातील घटकांना कल्याणकारी योजनांचा लाभ देण्यासाठी एकाच असंघटीत कल्याणकारी मंडळाची स्थापना करण्याची घोषणा मा.वित्तमंत्री यांनी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, असंघटीत क्षेत्रातील कामगार कल्याण मंडळात यंत्रमाग कामगार, शेतमजूर, पत्रकार व वृत्तपत्र विक्रेते, ट्रक चालक, वाहनचालक, लोकप्रतिनिधींचे स्वीय सहायक यांचाही समावेश करण्याची मागणी विविध लोकप्रतिनिधींकडून करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर कामगार कल्याणकारी मंडळात वरील घटकांचा समावेश करण्याबाबत व या प्रस्तावाबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२३-०२-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) असंघटीत कामगार सामाजिक सुरक्षा अधिनियम, २००८ अन्वये असंघटीत कामगार सामाजिक सुरक्षा मंडळ गठीत करण्याबाबत कार्यवाही शासनस्तरावर सुरू आहे. सदर मंडळाचे गठण झाल्यानंतर विविध घटकांचा समावेश करण्याबाबत व या प्रस्तावाबाबत मंडळामार्फत योग्य तो निर्णय घेण्यात येईल.
(४) विलंब झालेला नाही.

---

**राज्यातील स्मार्ट सिटी प्रकल्पांची कामे संथगतीने सुरु असल्याबाबत**

**(३६) ३६१३५ (०४-०१-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड, अॅड.जयदेव गायकवाड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) स्मार्ट सिटी योजनेंतर्गत राज्यातील दहा शहरांची निवड झाली असून यातील कामे संथगतीने सुरु असून तीन वर्षात १२ हजार कोटी रुपयांची कामे पूर्ण होणे अपेक्षित असताना आतापर्यंत आठ शहरातील सुमारे २११ कोटी रुपयांची कामे पूर्ण झाली आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त योजनेंतर्गत एकूण किती प्रकल्प कार्यान्वित करावयाचे आहेत, तसेच त्यासाठी किती खर्च निश्चित करण्यात आला आहे, प्रत्यक्षात किती प्रकल्पांची कामे सुरु करण्यात आली आहेत व त्यावर माहे ऑक्टोबर, २०१७ अखेर किती खर्च करण्यात आला आहे,
(३) असल्यास, उर्वरित प्रकल्पांची सद्य:स्थिती काय आहे व त्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे व सदर निधी केव्हा उपलब्ध करण्यात येणार आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२-०२-२०१८) :** (१)

- केंद्र सरकारच्या मार्गदर्शक तत्वानुसार राज्यातील १० संभाव्य शहरांपैकी ८ शहरांची स्मार्ट शहरे म्हणून विकसित करण्यासाठी केंद्र शासनाने निवड केली आहे.

- उर्वरीत २ शहरांच्या निवडीसाठी केंद्र शासनास शिफारस करण्यात आली आहे.
- केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार प्रत्येक स्मार्ट सिटीसाठी विशेष उद्देश वहनाचे (एस.पी.व्ही.) गठण करण्यात आले आहे.
- सदर एस.पी.व्ही. ना सर्व प्रशासकीय तसेच वित्तिय अधिकार देण्यात आले असून प्रकल्प कालमर्यादेत राबविण्याची पूर्ण जबाबदारी एस.पी.व्ही. ची आहे.
- या अभियानांतर्गत एकूण रुपये १९९.०७ कोटीचे १७ प्रकल्प पूर्ण झाले आहेत. रुपये १०४५.३७ कोटी किंमतीच्या २९ प्रकल्पांची कामे सुरु झाली आहेत.
- तसेच, रुपये ६९६.६ कोटी किंमतीच्या ९ प्रकल्पांची कामे निविदाधीन असून उर्वरीत प्रकल्पाच्या कामांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यात येत आहे.

(२) स्मार्ट सिटी योजना जून, २०१५ मध्ये सुरु झाली असून स्मार्ट सिटी चॅलेंज अंतर्गत राज्यातील ८ शहरांची निवड ही ३ विविध टप्प्यांमध्ये जानेवारी, २०१६ ते जून, २०१७ या कालावधीत झाली आहे.

तद्नंतर केंद्र शासनाच्या सूचनेनुसार विशेष उद्देश वहनांचे (एस.पी.व्ही.) गठन झाले असून त्यानंतर प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार नियुक्ती, डी.पी.आर. तयार करणे, निविदा प्रक्रिया पूर्ण करणे इत्यादी बाबींची पूर्तता करून रुपये १९९.०७ कोटी किंमतीची १७ कामे पूर्ण झाली आहेत. उर्वरीत कामे प्रगतीपथावर आहेत, हे खरे आहे.

(३) व (४)

- स्मार्ट सिटी योजनेंतर्गत आतापर्यंत निवड झालेल्या ८ शहरात मिळून एकूण २८५ प्रकल्प कार्यान्वित करावयाचे आहेत. त्यासाठी रुपये १९,४५६.३ कोटी खर्च निश्चित करण्यात आला आहे.
- आतापर्यंत रुपये १९९.०७ कोटीचे १७ प्रकल्प पूर्ण झाले असून रुपये १०४५.३७ कोटींच्या २९ प्रकल्पासाठी कार्यादेश देण्यात आलेले आहेत, तसेच रुपये ६९६.६ कोटींचे ९ प्रकल्प निविदा प्रक्रियेत आहेत. उर्वरित प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यात येत आहेत.

- एकूण निवड झालेल्या ८ शहरांना त्यांचे प्रकल्प पूर्ण करण्यासाठी रुपये १९४५६.३० कोटी रकमेची आवश्यकता आहे. या ८ शहरांना केंद्र, राज्य व स्थानिक स्वराज्य संस्था यांच्याकडून एकूण रुपये ८००० कोटी इतका निधी अभियान कालावधीत उपलब्ध होणार आहे.
- उर्वरीत निधी संबंधित शहराच्या स्मार्ट सिटी प्रस्तावात दर्शविल्याप्रमाणे सार्वजनिक खाजगी भागीदारी (पी.पी.पी.), महानगरपालिका निधी, इतर योजनांतील निधी रूपांतरण (कनव्हर्जनस) इत्यादी विविध मार्गांनी उपलब्ध होणे प्रस्तावित आहे.
- या योजनेतील विविध टप्प्यांवरील सर्व प्रकल्पांना गती देण्याच्या सूचना विशेष उद्देश वहनास (एस.पी.व्ही.) देण्यात आल्या आहेत.

---

## मुंबई पश्चिम उपनगरातील “वांद्रे ते वर्सोवा” सी-लिंकच्या दुसऱ्या टप्प्याचे काम सुरू करण्याबाबत

**(३७) ३६५४६ (०३-०१-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.नरेंद्र पाटील, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित, श्री.जयवंतराव जाधव, ॲड.निरंजन डावखरे, श्री.सुनिल तटकरे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पश्चिम उपनगरातून मुंबई जलद वाहतुकीचा पर्याय देण्याकरीता सी-लिंकच्या “वांद्रे ते वर्सोवा” हा दुसरा टप्पा सुरु करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वांद्रे-वर्सोवा सि-लिंकच्या टप्प्याच्या प्रकल्पाला किती खर्च येणार आहे,

(३) असल्यास, या प्रकल्पाच्या टप्प्यासाठी आवश्यक पर्यावरणविषयक व सीआरझेडबाबतच्या परवानग्या मिळाल्या आहेत काय तसेच हा प्रकल्प किती वर्षात पूर्ण करण्यात येणार आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२१-०२-२०१८) :** (१) व (२) होय.

मंत्रिमंडळाच्या पायाभूत सुविधा समितीच्या दिनांक १३ जून, २०१७ बैठकीत मान्यता दिल्यानुसार दिनांक ०४/१२/२०१७ रोजीच्या शासन निर्णय क्र. व्हीबीएस-२०११/प्र.क्र.१३०/२०११/रस्ते-६, अन्वये वांद्रे ते वर्सोवा प्रकल्पाच्या रुपये ७,५०२/- कोटी किंमतीच्या सागरी सेतूचे बांधकामास प्रशासकीय मान्यता दिली आहे.

(३) जानेवारी, २०१३ मध्ये केंद्रीय वन व पर्यावरण मंत्रालयाकडून CRZ Clearance प्राप्त झाले आहे. ०२/०२/२०१७ रोजी SEIAA (State Level Environment Impact Assessment Authority) कडून Environment Clearance प्राप्त झाले आहे.

सदर प्रकल्प कंत्राटदार नियुक्तीच्या आदेशापासून ५ वर्षात पूर्ण करण्यात येणार आहे.

(४) इपीसी तत्वावर कार्यान्वित करण्यासाठी पूर्व अर्हता प्राप्त कंत्राटदारांची निवड करण्यात आली आहे तसेच सदर प्रकल्पाकरीता आर्थिक देकार मागविण्यात आले आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनीकडून अतिउच्च दाब उपकेंद्रे स्थापन करण्याबाबत

**(३८) ३६५५१ (०२-०१-२०१८). प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी येत्या पाच वर्षाच्या कालावधीत १४ हजार २५६ किलोमिटरच्या वाहिन्यांचे जाळे तयार करुन राज्यात ८६ अतिउच्च दाबाची उपकेंद्र निर्माण करण्याचा निर्णय शासनाने माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतलेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्याच्या अनेक विभागात उपकेंद्राची मागणी होत असल्यामुळे अंतिम आराखडा पारेषण कंपनीकडून तयार करण्यात आलेला आहे काय, सदर आराखडयाचे स्वरुप काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१६-०२-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

विद्युत कायदा, २००३ च्या कलम ३९ मधील तरतुदीनुसार राज्य शासनाने महापारेषण कंपनीस राज्य पारेषण उपयोगिता म्हणून अधिसूचित केले आहे. त्यानुसार पारेषण पायाभूत सुविधा उभारण्याच्या अनुषंगाने सन २०१७-१८ ते सन २०२२-२३ या कालावधीकरिता, प्रणाली अभ्यासानुसार आखण्यात आलेल्या आराखडयाप्रमाणे, संपूर्ण राज्यात (मुंबई व मुंबई उपनगर वगळून) एकूण ९० अति उच्च दाब उपकेंद्रे उभारणे, १४२५३ सर्किट कि.मी. अति उच्च दाब वाहिन्या उभारणे व स्थापित क्षमतेत ३०१९६ एम.व्ही.ए.ची वाढ करणे प्रस्तावित आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**श्री.कविटकर हे प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी**
**रुजू न झाल्याबाबत**

**(३९) ३६५७१ (०२-०१-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) श्री.अशोक कविटकर (सहा. वन संरक्षक), उपसंचालक शिक्षण -१), चंद्रपूर विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) यांची दिनांक १२ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास मा.मुख्यमंत्री, मुख्य सचिव, सचिव (वने), अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे, मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती यांना चंद्रपूर येथून करण्यात आलेल्या नियमबाह्य प्रतिनियुक्तीबाबत तक्रारी केल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, श्री.कविटकर यांनी प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी रुजू होणे क्रमप्राप्त असतांना इतर कार्यभार स्विकारला, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शासनाच्या धोरणानुसार बदली, प्रतिनियुक्ती झालेल्या स्थळी पदभार स्विकारावा, असे धोरण असतांना वरिष्ठांशी संगनमत करुन इतरत्र ठिकाणी पदभार स्विकारला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १७ डिसेंबर, २०१६ चे अनुषंगाने श्री.अशोक कविटकर हे वर्ग-१ चे अधिकारी असून, स्वतःच्या जिल्ह्यात प्रतिनियुक्तीवर आहेत, ही बाब शासनाच्या धोरणाविरुध्द असूनही तक्रारीवर आजपर्यंत कारवाई झाली नाही, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले त्यानुषंगाने सदर निवेदनावर कोणतीही कार्यवाही न करणाऱ्या विभागातील सहसचिव, कक्ष अधिकारी यांचेविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०१-०२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) हे खरे नाही, श्री.काविटकर यांची प्रतिनियुक्ती करण्यात आलेल्या सहाय्यक वनसंरक्षक (रोहयो व अतिक्रमण निर्मुलन) अमरावती या पदावर ते रुजू झाले आहेत.
(४) हे खरे नाही, या अनुषंगाने तक्रारदार यांना दिनांक १४/११/२०१७ रोजी वस्तुस्थितीदर्शक उत्तर देण्यात आले आहे.
(५) प्रस्तुत प्रकरणामध्ये शासनाने चौकशी केली असून तक्रारदार यांना दिनांक १४/११/२०१७ रोजी वस्तुस्थितीदर्शक उत्तर देण्यात आले आहे त्यामुळे कारवाई करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील कृषी उत्पन बाजार समितीमधील कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत सामावून घेण्याबाबत**

**(४०) ३६८४० (०२-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समितीमधील कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत सामावून घेण्याबाबत अभ्यास करण्यासाठी शासनाने माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान समिती स्थापन केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, समितीस अहवाल सादर करण्यासाठी २ महिनाचा कालावधी देण्यात आला होता, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, शासनास समितीचा अहवाल सादर करण्यात आला आहे काय, त्यात कोणत्या शिफारशी करण्यात आल्या आहेत,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०६-०२-२०१८)** : (१) होय.

(२) होय.

(३) अभ्यास समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाला असून त्यामध्ये खालीलप्रमाणे पर्याय सुचविण्यात आले आहेत.

१) राज्यातील बाजार समित्यांचे सर्व संवर्गातील १०० टक्के कर्मचारी शासनाच्या सेवेत सामावून घ्यावेत व त्यांचे वेतन, भत्ते इ. शासनाकडून भागविण्यात यावेत. तसेच या बाजार समित्यांचे व्यवस्थापन करण्यासाठी संचालक मंडळाची नियुक्ती शासनाने करावी.

२) राज्यातील बाजार समित्यांचे सर्व संवर्गातील १०० टक्के कर्मचारी शासनाच्या सेवेत सामावून घेतल्यास शासनावर पडणारा १०० टक्के वेतन, भत्ते खर्चाचा आर्थिक बोजा सहन करणे शासनास शक्य नसल्यास राज्यशासन व बाजार समिती यांच्यात आर्थिक बोजा स्विकारण्याचे सुत्र निवडण्याचे पर्याय दिले आहेत. याकरिता सन २०१७-१८ चे मंजूर अर्थसंकल्पानुसार बाजार समित्यांच्या कर्मचाऱ्यांवरील आस्थापना खर्चाचा बोजा रुपये ३११.१३ कोटी गृहीत धरण्यात आला आहे.

३) राज्यातील बाजार समित्यांचे अधिकारी, कर्मचारी व कनिष्ठ कर्मचारी या तीन संवर्गापैकी फक्त अधिकारी या संवर्गातील कर्मचाऱ्यांना शासनाच्या सेवेत सामावून घेवून त्यांचे वेतन, भत्ते इ. करिता होणारा खर्च शासनाकडून भागविण्यात यावा. तथापि उर्वरीत कर्मचाऱ्यांचे नेमणूक, वेतन, भत्ते इ. व संचालक मंडळाची निवड ही व्यवस्था सद्याच्या प्रचलीत पध्दतीने राहील.

४) राज्यातील बाजार समित्यांच्या कर्मचाऱ्यांच्या आस्थापना विषयक सर्व बाबींचे कामकाज पाहण्यासाठी महाराष्ट्र राज्य बाजार समिती सहकारी संघ किंवा राज्यस्तरीय स्वतंत्र यंत्रणा निर्माण करावी व त्या यंत्रणेमार्फत बाजार समित्यांच्या कर्मचाऱ्यांचे सेवानियम निश्चित करुन नेमणूक, वेतन, भत्ते इ. करिता होणारा खर्च सदरची संस्था / यंत्रणेकडून भागविण्यात यावा. त्याकरिता खर्चासाठी आवश्यक तो निधी राज्यातील बाजार समित्यांनी सदर संघाकडे किंवा यंत्रणेकडे जमा करावा.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कौशल्य विकास विभागातील शिक्षकांच्या भरतीसाठी चुकीची जाहिरात दिल्याबाबत

**(४१) ३६९०२ (०४-०१-२०१८). श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने शिक्षक भरतीसाठी दिनांक २९ ऑगस्ट, २०१४ रोजी वा त्यासुमारास कौशल्य विकास विभागातील शिक्षकांच्या भरतीसाठी चुकीची जाहिरात दिली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यामुळे ११४६ शिक्षकांची भरती प्रक्रिया रखडली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१५-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही.

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत असलेल्या संस्थांमधील शिक्षकीय व शिक्षकेतर नियमित वेतनश्रेणीतील ७०२ पदांची व ठोक वेतनावरील ४३० पदांची अशी एकूण ११३२ पदांची पदभरतीची जाहिरात दिनांक २९/०८/२०१४ व दिनांक १३/०९/२०१४ रोजी प्रसिध्द करण्यात आली होती. सदर जाहिरातीमध्ये एकूण २८० शिल्प निदेशक पदांचा समावेश होता.

(२) हे खरे नाही.

ठोक वेतनावरील सुरु असलेल्या तुकडयांसाठी संलग्नता प्राप्त नसल्याने ठोक वेतनावरील ४३० पदांची जाहिरात प्रसिध्द झालेनंतर भरती प्रक्रियेआधी रद्द केली आहे. नियमित वेतनश्रेणीतील ७०२ पदांना मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण खंडपीठ औरंगाबाद यांनी दिनांक ०६/०५/२०१६ रोजी दिलेल्या आदेशान्वये व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने प्रसिध्द केलेली पदभरतीची जाहिरात रद्द करण्यात आली होती. सदर आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट पिटीशन क्र ११०५५/२०१६ अन्वये शासनाच्यावतीने अपील दाखल करण्यात आले होते. सदर अपिलाच्या

अनुषंगाने मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद यांचे दिनांक २३/११/२०१६ रोजी दिलेल्या अंतरिम आदेशानुसार शिल्प निदेशक २८० पदे वगळून उर्वरित पदांची भरती प्रक्रिया करण्यास संमती दिली होती. त्यानुसार शिल्प निदेशक पदे वगळून उर्वरित ४२२ पदांची भरती प्रक्रिया अंतिम टप्प्यात असून उमेदवारांना नियुक्तीचे आदेश देण्याची प्रक्रिया प्रादेशिक कार्यालयाच्यास्तरावर सुरु आहे.

त्यामुळे ११४६ शिक्षकांची भरती प्रक्रिया रखडली आहे हे खरे नाही. मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे दिनांक २२/०८/२०१७ रोजीचे अंतिम आदेशानुसार एकूण २८० शिल्प निदेशकांची भरतीप्रक्रिया रद्द केली आहे.

(३) मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे दिनांक २२/०८/२०१७ रोजीचे अंतिम आदेशानुसार शिल्प निदेशक पदाची भरती प्रक्रिया रद्द केली असल्याने चौकशी करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## दगड धानोरा (ता.नेर, जि.यवतमाळ) येथे ग्रामपंचायतीने सागवानाची झाडे तोडल्याबाबत

**(४२) ३७०३८ (०२-०१-२०१८). श्री.मोहनराव कदम, श्री.हरिसिंग राठोड, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दगड धानोरा (ता.नेर, जि.यवतमाळ) येथे ग्रामपंचायतीने वृक्षारोपण करुन लावलेली सागवानाची झाडे तोडण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१२-०२-२०१८) :** (१) दगड धानोरा (ता.नेर, जि.यवतमाळ) येथील ग्रामपंचायतीने वृक्षारोपण करुन लावलेली २ सागवान झाडे तोडल्याचे निदर्शनास आले आहे.
(२) सदर प्रकरणी तहसिलदार नेर यांनी अवैध वृक्षतोडीबाबत अज्ञात व्यक्तीविरुध्द एफआयआर दाखल करुन प्रकरणी दिनांक २३/१२/२०१६ रोजी नायब तहसिलदार, नेर यांचेकडून अंतिम आदेश पारीत करण्यात येऊन प्रकरण खारीज केले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नांदेड जिल्ह्यातील वाढती गुन्हेगारी रोखण्याबाबत

**(४३) ३७०४२ (०४-०१-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नांदेड जिल्ह्यातील पोलीस यंत्रणाकडून होत असलेल्या दुर्लक्षामुळे जिल्ह्यात खुन, घरफोडी, दरोडा या प्रकरणात मोठ्या प्रमाणात वाढ होऊन कायदा व सुव्यवस्था बिघडलेली असल्याची बाब माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मागील एक वर्षापासून उक्त जिल्ह्यात किती खुन, घरफोडी, दरोड्याच्या घटना घडल्या आहेत तसेच किती प्रकरणांचा शोध घेऊन दोषींवर कारवाई केली याचा संपूर्ण तपशील काय आहे,
(३) असल्यास, उक्त जिल्ह्यातील वाढती गुन्हेगारी रोखण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही.

माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान खुन, घरफोडी, दरोडयाचे गुन्हयांचे घटनेमुळे किंवा अन्य कोणत्याही घटनेमुळे नांदेड जिल्ह्यात कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण झाला नाही.

माहे ऑक्टोबर, २०१६ च्या तुलनेत माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये खुन, घरफोडी, दरोडा या सदराखाली नांदेड जिल्ह्यात घडलेल्या गुन्ह्यांची तुलनात्मक माहिती खालील नमूद प्रमाणे सादर आहे.

| गुन्ह्याचा प्रकार | माहे ऑक्टोबर, २०१६ | | माहे ऑक्टोबर, २०१७ | | फरक |
|---|---|---|---|---|---|
| | दाखल | उघड | दाखल | उघड | |
| खुन | ६ | ६ | ४ | ३ | -२ |
| घरफोडी | २५ | १० | ३१ | ६ | +६ |
| दरोडा | २ | १ | ० | ० | +२ |

(२) सन २०१६ आणि सन २०१७ मध्ये नांदेड जिल्ह्यात खुन, घरफोडी व दरोडा या सदराखाली दाखल गुन्ह्यांची तुलनात्मक माहिती खालील नमूद प्रमाणे सादर आहे.

| गुन्ह्याचा प्रकार | सन २०१६ | | सन २०१७ | | फरक |
|---|---|---|---|---|---|
| | दाखल | उघड | दाखल | उघड | |
| खुन | ७५ | ७० | ५९ | ५७ | -१६ |
| घरफोडी | २९१ | ६१ | २९५ | ७६ | +४ |
| दरोडा | १० | ०९ | १२ | १० | +२ |

(३) विविध गुन्ह्यास प्रतिबंध करण्यासाठी नांदेड जिल्ह्यातील सर्व पोलीस स्टेशनच्यास्तरावर, उपविभागस्तरावर तसेच जिल्हा स्तरावर नाईट पेट्रोलींग, केंद्रीय नाईट पेट्रोलींग योजना तयार करण्यात आली आहे. दररोज रात्री २३.०० ते ०४.०० वाजे पावेतो योजना प्रमाणे पोलीस अधिकारी व कर्मचारी नेमण्यात येवून रात्रगस्त व पेट्रोलींग करण्यात आहे.

दररोज नाईट पेट्रोलींग दरम्यान अचानक नाकाबंदी करुन संशयीत वाहने/संशयीत व्यक्ती व अभिलेखावरील गुन्हेगार चेक करुन कायदेशीर कार्यवाही करण्यात येत आहे. सकाळी ०५.०० ते ०६.०० दरम्यान गुडमॉर्निग पेट्रोलींग दररोज करण्यात येत आहे.

नांदेड जिल्ह्यातील इतर पोलीस स्टेशनच्या विद्यार्थीनी व महिला विरुध्द गुन्ह्यास प्रतिबंध करण्यासाठी नांदेड जिल्ह्यातील शाळा, महाविद्यालय, खाजगी शिकवणी (ट्युशन क्लासेसच्या ठिकाणी) इत्यादी ठिकाणी महिला गस्तपथकाव्दारे नियमित पेट्रोलींग करण्यात येत आहे.

नांदेड शहरात सेफ सिटी प्रोजेक्ट अंतर्गत नांदेड शहरात महत्वाच्या ४७ ठिकाणी एकूण ९७ सी.सी.टी.व्ही. कॅमेरे स्थापित करण्यात आलेले आहेत.

तसेच, जिल्हा कारागृहातून सुटलेले मालमत्ता संबंधाने गुन्ह्यातील सक्रिय गुन्हेगार तसेच अभिलेखावरील सक्रिय गुन्हेगारांचे हालचालीवर लक्ष ठेवून त्यांचेविरुध्द प्रतिबंधक कार्यवाही करण्यात येत आहे.
(४) विलंब झालेला नाही.

---

**राज्यातील शहरांच्या विकास आराखडयांच्या पद्धतीबाबत**

**(४४) ३७१७४ (०४-०१-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.जनार्दन चांदूरकर, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील शहरांचे विकास आराखडे तयार करुन २० वर्षांमध्ये शहरात त्यांची अंमलबजावणी करायची हे स्वातंत्र्यानंतर स्वीकारलेले सूत्र अजूनही तसेच राबविले जात असल्याचे माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कोणताही विकास आराखडा सादर करताना त्यांच्यासोबत त्यांच्या अंमलबजावणीसाठी आर्थिक योजना सादर करण्याची पध्दत जगभर आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर पध्दत स्वीकारण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-०२-२०१८) :** (१) ते (३) राज्यातील शहरांचे विकास आराखडे महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ मधील तरतुदीनुसार २० वर्षाच्या कालावधीसाठी तयार करण्यात येतात. तथापि त्यामधील आरक्षणे तसेच रस्त्याचे प्रस्ताव विकास योजना अंमलात आल्यापासून साधारणपणे १० वर्षाच्या आत पूर्ण करण्याचे नियोजन करण्यात येते. सदरची अंमलबजावणी होणेकरीता विकास योजना अहवालात वर्षनिहाय आरक्षणे अंमलबजावणीबाबतचा प्राधान्यक्रम नमूद करण्यात येतो.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महानंद डेअरीकडून मुंबईतील दूध वितरकांना प्रतिलिटरला कमी कमिशन दिले जात असल्याबाबत

**(४५) ३७२३६ (०३-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **दुग्धविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महानंद डेअरीकडून मुंबईतील दूध वितरकांना प्रतिलिटरला २ रुपये ९० पैसे एवढे तुटपुंजे कमिशन दिले जाते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यामध्ये साडेचार रुपयांपर्यंत वाढ करावी म्हणून वारंवार पाठपुरावा करुनही निर्णय होत नसल्याने वितरकांनी महानंद डेअरीच्या दूधाचे वितरण थांबवून पाच रुपये प्रतिलिटर कमिशन देणाऱ्या इतर अमूल, नंदिनीसारख्या परराज्यातील ब्रॅण्डचे दूध वितरण करण्याचा इशारा दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून यासंदर्भात कमिशन वाढविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (०७-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही. सध्या वितरकांना प्रति लिटर रुपये ३.१५ इतके कमिशन महानंदामार्फत दिले जात आहे.

(२) महासंघांच्या दूध वितरकांनी कमिशन वाढून मिळावे अशी विनंती महासंघास केली आहे हे खरे आहे. मात्र, कोणत्याही वितरकाने महानंदाचे दूध वितरण करण्याचे कामकाज थांबविलेले नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पनवेल येथील तळोजा औद्योगिक क्षेत्रातील कंपनीने ९१ कामगारांना कामावरुन कमी केल्याबाबत

**(४६) ३७६०१ (०४-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पनवेल येथील तळोजा औद्योगिक क्षेत्रातील असाही इंडिया ग्लास कंपनी सन २०१४ मध्ये बंद करण्यात आली होती त्यावेळी ९१ कामगारांना कामावरुन काढून टाकण्यात आले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सद्य:स्थितीमध्ये उक्त कंपनी पूवर्वत सुरु झाली असून कंपनीचे उत्पन्नही सुरु झालेले असून कंपनी बंद असताना काढून टाकण्यात आलेल्या उक्त ९१ कामगारांना पुन्हा कामावर घेण्यात आलेले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, कामावरुन कमी केलेल्या कामगारांना पूर्ववत कामावर घ्या अन्यथा तीव्र आंदोलन करण्याचा इशारा भाजपचे रायगड जिल्हाध्यक्ष यांनी माहे नोव्हेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१५-०२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३) होय, हे खरे आहे.

(४) औद्योगिक विवाद अधिनियम, १९४७ च्या कलम २५ (ओ) (५) मधील तरतुदीनुसार प्रस्तुतचे प्रकरण मा.औद्योगिक न्यायालय ठाणे यांचेकडे संदर्भित करण्यात आले असून सदरचे प्रकरण सध्या न्यायप्रविष्ठ आहे.

सदर प्रकरणी शासनस्तरावर वेळोवेळी संपन्न झालेल्या बैठकातील निदेशांनुसार, व्यवस्थापन व संघटना यांच्यामध्ये समन्वय साधून समेट घडवून आणण्याची कार्यवाही क्षेत्रिय कार्यालयाकडून प्रगतीत आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण मुंबई तसेच प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई यांचेकडून मुंबई विभागातील पदोन्नत्या रखडल्याबाबत

**(४७) ३७६१३ (०४-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई तसेच प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई यांचेकडून मुंबई विभागातील वर्ग-३ व वर्ग-४ च्या सन २०१३ पासून पदोन्नत्या रखडलेल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील सहा प्रादेशिक विभागापैकी मुंबई वगळता इतर पाचही विभागांनी वर्ग-३ व वर्ग-४ ची पदोन्नती कोट्यातील पदे भरले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, कर्मचारी व निदेशक संघटना यांनी सहसंचालक, मुंबई यांना वेळोवेळी निवेदने देऊनही त्यावर कोणतीच कारवाई करण्यात येत नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, पदोन्नतीस पात्र असलेले कर्मचारी पदोन्नती विना सेवानिवृत्त झाल्याने त्यांचे आर्थिक नुकसान झाले असून या विभागाच्या तुलनेत इतर विभागातील वर्ग-३ व वर्ग-४ चे कनिष्ठ कर्मचारी यांना पदोन्नती मिळालेली आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, केवळ आर्थिक लाभ होत नाही म्हणून विभागामार्फत पदोन्नती रोखण्यात येत आहेत, हे ही खरे आहे काय,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१५-०२-२०१८) :** (१) नाही, हे खरे नाही.

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील मुंबई विभागात जानेवारी, २०१५ पर्यंत पदोन्नत्या देण्यात आलेल्या आहेत.

(२) नाही, हे खरे नाही.

मुंबई विभागात जानेवारी, २०१५ पर्यंत पदोन्नत्या देण्यात आलेल्या आहेत. उर्वरीत पाच विभागात वर्ग ३ व वर्ग ४ संवर्गातील कर्मचाऱ्यांना नियमानुसार जेष्ठतेप्रमाणे पदोन्नत्या देण्यात आलेल्या आहेत.

(३) नाही, हे खरे नाही.

(४) नाही, हे खरे नाही.

वर्ग ३ व वर्ग ४ कर्मचाऱ्यांची प्रादेशिक विभाग निहाय सेवाजेष्ठतासूची स्वतंत्रपणे ठेवण्यात येत असल्याने कनिष्ठ कर्मचारी यांना पदोन्नती मिळालेली आहे, असे म्हणणे उचित होणार नाही.

(५) नाही, हे खरे नाही.

(६) मुंबई विभागाचेबाबतीत मागासवर्गीय कक्षाकडून विविध संवर्गांच्या बिंदूनामावल्या प्रमाणित न झाल्याने पदोन्नत्या देण्यासाठी विलंब झाला

आहे. मागासवर्गीय कक्षाकडून उपस्थित त्रुटींची पूर्तता करून बिंदूनामावल्या मागासवर्गीय कक्षाकडे सादर करण्याची कार्यवाही व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाकडून करण्यात येत आहे.

दरम्यान सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी-२०१७/प्र.क्र.३१२A/१६-ब, दिनांक २९/१२/२०१७ च्या पत्रातील पदोन्नती संदर्भात मार्गदर्शक सूचनांनुसार सेवाजेष्ठता विचारात घेऊन पदोन्नती देणेसंदर्भात कार्यवाही संचालनालयस्तरावर सुरु आहे.

---

**बाजरी प्रकरणातील बडतर्फ केलेले स्वस्त धान्य दुकान बेकायदेशीरपणे पुन्हा सुरु केल्याबाबत**

**(४८) ३७६२० (०२-०१-२०१८). श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गेवराई (जि.बीड) तालुक्यात सन १९९३ मध्ये शासनाने थेट शेतकऱ्यांकडून हमी भावाने बाजरी खरेदी करताना झालेल्या गैरव्यवहारात १०४ स्वस्त धान्य दुकाने बडतर्फ केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासकीय स्वस्त धान्य वितरण प्रणालीमध्ये सुसंगतपणा यावा यासाठी सुमारे ४४ दुकाने सेवा सहकारी संस्था यांना जोडण्याचा निर्णय शासनाने घेतला होता, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणात बडतर्फ केलेले मौजे मारफाळा (ता.गेवराई, जि.बीड) येथील स्वस्त धान्य दुकानाचा परवाना बेकायदेशीरपणे पुन्हा मूळ मालकास वा त्याच्या वारसाला मंजूर करण्यात येऊन माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये त्यास नियतन अदा करण्यात आल्याने सदर प्रकरणाची चौकशी करण्याची मागणी लोकप्रतिनिधींनी जिल्हाधिकारी, बीड यांच्याकडे दिनांक १३ नोव्हेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर दुकान संबधित सेवा सहकारी संस्थेला देण्याबाबत कार्यवाही करुन दोषींविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१५-०२-२०१८) :** (१) व (२) हे अंशत: खरे आहे.

सन १९९३ मध्ये थेट शेतकऱ्यांकडून हमी भावाने बाजरीची खरेदी करतांना गेवराई (जि.बीड) तालुक्यात झालेल्या गैरव्यवहार प्रकरणी एकूण ६५ स्वस्त धान्य दुकानांचे परवाने रद्द करण्यात आले. ६५ दुकानांचे परवाने रद्द केल्यामुळे लाभार्थ्यांची गैरसोय होऊ नये यास्तव रद्द केलेल्या स्वस्त धान्य दुकानांची पर्यायी व्यवस्था अन्य स्वस्त धान्य दुकानांकडे करण्यात आली होती.

(३) मौजे मारफळा येथील रास्तभाव दुकानाची पर्यायी व्यवस्था सेवा सहकारी सोसायटी, मारफळा यांचेमार्फत करण्यात आली होती. या विरोधात श्री.विठ्ठल दामोधर कुटे, मुळ प्राधिकार पत्रधारक यांनी जिल्हा पुरवठा अधिकारी, बीड यांच्याकडे तक्रार दाखल केली. उक्त तक्रारीच्या अनुषंगाने जिल्हा पुरवठा अधिकारी, बीड यांनी दिनांक २ मे, २०१७ रोजीच्या आदेशान्वये सेवा सहकारी संस्थेचे प्राधिकार पत्र अवैध ठरवून श्री.विठ्ठल दामोधर कुटे, रा.मारफळा यांचे नावे प्राधिकारपत्र व किरकोळ केरोसीन परवाना असल्याबाबतचे आदेश पारित केले. सदर आदेशाच्या अनुषंगाने माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये श्री.विठ्ठल दामोधर कुटे, रा.मारफळा यांचे नावे धान्याचे नियतन मंजूर करण्यात आले होते.

जिल्हाधिकारी, बीड यांचे कार्यालयात लोकप्रतिनिधी यांचेकडून प्राप्त झालेल्या दिनांक १३/११/२०१७ रोजीच्या पत्रास अनुसरुन सदर प्रकरण जिल्हा तक्रार निवारण अधिकारी तथा अपर जिल्हाधिकारी, बीड यांचे न्यायासनाकडे सखोल चौकशी प्रस्तावित करण्यात आलेली आहे.

(४) व (५) उपायुक्त पुरवठा, औरंगाबाद यांच्या दिनांक ६ सप्टेंबर, २०१७ च्या आदेशास अनुसरुन मौजा-मारफळा प्रकरणातील वादी व प्रतिवादी यांची चौकशी जिल्हा पुरवठा कार्यालयामार्फत सुरु असून सर्व कागदपत्रांची शहानिशा करुन अंतिम आदेश पारीत करण्याबाबत कार्यवाही सुरु आहे.

---

## भिवंडी-निजामपूर महानगरपालिकेच्या शिक्षणमंडळाचे शिक्षणाधिकारी पद दोन वर्षापासून रिक्त असल्याबाबत

**(४९) ४१६७६ (२८-०८-२०१३). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भिवंडी-निजामपूर महानगरपालिका शिक्षण मंडळाच्या विविध माध्यमाच्या प्राथमिक शाळांची व शाळांमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या किती आहे,

(२) असल्यास, या महानगरपालिकेच्या शिक्षण मंडळास शिक्षणाधिकारी वर्ग-२ चे पद रिक्त ठेवण्याची कारणे काय आहेत,

(३) नियमित शिक्षणाधिकारी नसतांनाही शिक्षण हक्क विधेयकाची अंमलबजावणी कशी होत आहे,

(४) सदरचे रिक्त पद भरण्याबाबत शासनाने कोणती उपाययोजना केली आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०२-२०१८) :** (१) भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या शिक्षण मंडळात प्राथमिक शाळा ९६ असून विद्यार्थ्यांची संख्या २९२७३ इतकी आहे.

(२) व (३) भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या शिक्षण मंडळाच्या आस्थापनेवर शिक्षणाधिकारी (वर्ग-२) चे पद, वेतनखर्चाचा बोजा महानगरपालिकेने स्विकारण्याच्या अटीवर सन २००६ पासून नियुक्त करण्यात आले आहेत.

तथापि, संबंधित शिक्षणाधिकारी (वर्ग-२) यांची सन २००८ मध्ये बदली झाल्याने सदरचे पद रिक्त आहे. शिक्षणाधिकारी या पदाचा कार्यभार प्रशासन अधिकारी यांच्याकडे सोपविला असून शिक्षण हक्क विधेयकाची अंमलबजावणी करण्यात येत आहे.

(४) शालेय शिक्षण विभागामार्फत रिक्त पदे भरण्याची कार्यवाही सुरु असल्याचे शालेय शिक्षण विभागाने कळविले आहे.

---

## सफाई कर्मचारी आयोगाची पुनर्बांधणी तसेच महर्षी वाल्मिकी महामंडळ स्थापन करण्याबाबत

**(५०) ५०८२७ (०१-०७-२०१४). श्री.जयवंतराव जाधव, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सफाई कर्मचारी आयोगाची पुनर्बांधणी तसेच महर्षी वाल्मिकी महामंडळ स्थापन करण्याबाबत दोन्ही प्रस्ताव माहे मार्च, २०१४ पर्यंत प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत कोणती कार्यवाही केली जात आहे,
(३) अद्याप कोणतीही कार्यवाही केलेली नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०३-०२-२०१८) :** (१), (२) व (३) दिनांक १० जानेवारी, २०१७ च्या अधिसूचनेनुसार सफाई कर्मचारी आयोगावर अध्यक्षांची नेमणूक करण्यात आली आहे.

सदर सफाई कामगारांना विविध योजनेंतर्गत स्वयंरोजगारासाठी कर्ज/अनुदान देण्यात येत असल्यामुळे महर्षि वाल्मिकी आर्थिक विकास महामंडळ हे स्वतंत्र महामंडळ स्थापन करुन शासनावरील आर्थिक भार वाढविणे संयुक्तिक होणार नाही.

---

**विधान भवन :** **डॉ. अनंत कळसे**
**मुंबई.** **प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, मुंबई.